रायगड-अलिबाग येथे जिल्हा माहिती भवन उभारण्याकरिता तत्वत: प्रशासकीय मान्यता देण्याबाबत.

**महाराष्ट्र शासन**
**सामान्य प्रशासन विभाग,**
**शासन निर्णय क्र.मावज-२०२१/प्र.क्र.१८५/का.३४**
**मंत्रालय, मुंबई ४०० ०३२.**
**दिनांक:- ११ एप्रिल, २०२२**

**वाचा-** १) संचांलक,माहिती प्रशासन पत्र क्र.प्रविस्था-०९(२०२१)/रा.अ.जिमाभवन/का-१/१५५४ दि.०६ ऑगस्ट,२०२१
२) शासन पत्र क्र.सामान्य प्रशासन विभागाचे क्र.मावज-२०२१/प्र.क्र.१८५/३४ दि.२१ ऑक्टोबर,२०२१
३) शासन निर्णय क्र. मावज-२०१७/प्र.क्र.११८/३४ दि.२४ फेब्रुवारी,२०२२

**प्रस्तावना :-**

मुख्यालयाचे बळकटीकरण व विभागीय/जिल्हा माहिती कार्यालयीन इमारत बांधकाम या योजनेकरिता प्रशासकीय मान्यता व CRC Code (लेखाशिर्ष) मिळण्याबाबतचा प्रस्ताव मंत्रिमंडळाच्या मान्यतेस्तव सादर केला असता दि.९.२.२०२२ रोजी मंत्रालय, मुंबई येथे झालेल्या महाराष्ट्र मंत्रिमंडळ बैठकीत प्रस्तावास महाराष्ट्र मंत्रिमंडळाकडून मान्यता देण्यात आली आहे. तसेच या नवीन योजनेला प्रशासकीय मान्यता देण्याबाबतचा शासन निर्णय क्र.मावज-२०१७/प्र.क्र.११८/का-३४, दि.२४.०२.२०२२ रोजी निर्गमित करण्यात आला. रायगड जिल्हयातील सर्व शासकीय कामकाजाच्या व्यापक प्रसिध्दीसाठी जिल्हा माहिती कार्यालय रायगड-अलिबाग हे कार्यालय कार्यरत असून अलिबाग येथे स्थानिक पातळीवर शासकीय जागा अथवा शासकीय इमारत उपलब्ध न झाल्याने हे कार्यालय पाध्येवाडी अलिबाग येथील नवरे इमारतीमध्ये भाडे तत्वावर सुरु होते. पाध्येवाडी येथील नवरे इमारत अत्यंत जुनी असल्याने व धोकादायक झाल्याने सदर चे कार्यालय दि. २१ मार्च,२०२० पासून जिल्हा नियोजन भवन, पहिला मजला, येथे तात्पुरत्या स्वरुपात स्थालांतरीत करण्यात आले असून ती जागा जिल्हा माहिती कार्यालयाचे कामकाज, कर्मचारी व कार्यालयाची निकड पाहता अत्यंत अपूरी आहे. यास्तव सदर कार्यालया करता स्वतंत्र इमारत बांधकामाची प्रशासकीय मान्यता देण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय:-**

मुख्यालयाचे बळकटीकरण व विभागीय/जिल्हा माहिती कार्यालयीन इमारत बांधकाम या योजनेकरिता दि.९.२.२०२२ रोजी मंत्रालय, मुंबई येथे झालेल्या महाराष्ट्र मंत्रिमंडळ बैठकीत प्रस्तावास महाराष्ट्र मंत्रिमंडळाकडून मान्यता देण्यात आली आहे. सदर योजनेच्या अंतर्गत रायगड-अलिबाग जिल्हा माहिती भवन उभारण्याकरिता खालील अटीच्या अधिन राहून प्रशासकीय मान्यता प्रदान करण्यात येत आहे.

१. जिल्हा माहिती कार्यालय इमारतीचे सार्वजनिक बांधकाम विभागाकडून टाईप प्लॅन (Type plan) तयार करुन त्यास शासनाची मान्यता घेण्यात येईल.

२. सार्वजनिक बांधकाम विभागाकडून या इमारतीच्या अंदाजपत्रकीय खर्च (Estimated Costs), नकाशे तयार करुन शासनास मान्यतेसाठी सादर करावे. काम सुरु करण्यापूर्वी नमुना नकाशा,मांडणी नकाशा तसेच विस्तृत नकाशास वास्तूविशारदांकडून मंजूरी घेऊनच सुरु करावे.

३. शासकीय जमिनीच्या ताबा मिळाल्यांनतर इमारत बांधकामाच्या प्रस्तावाला,संबंधित महानगरपालिका/नगरपालिका यांच्या कडून मंजूरी प्राप्त करुन घेण्यात यावी.

४. सार्वजनिक बांधकाम विभागाच्या शासन निर्णय क्रमांक बीडीजी २०१७ /प्र.क्र.६०/इमारती-२, दि. ०७/०७/२०१७ अन्वये कार्यवाही करण्यात यावी.

वरील बांबीची पूर्तता झाल्याशिवाय प्रत्यक्ष इमारत बांधकामाचे काम सुरु करु नये.

सदर शासन निर्णय क्र.विअप्र-२०१३/प्र.क्र.३०/२०१३/विनियम, भाग-२ वित्तीय अधिकार नियम पुस्तिका,१९७८ च्या भाग - पहिला, उपविभाग - पाच च्या अनु.क्र.१ च्या महाराष्ट्र सार्वजनिक बांधकाम नियम पुस्तिकेतील परिच्छेद क्र.१३४ मधील अटींच्या अधीन राहून निर्गमित करण्यात येत आहे.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यांत आला असून त्याचा संकेतांक २०२२०४१११९३८४७७६०७ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

**महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने,**

AVINDRA BHIKAJI MORYE

Digitally signed by AVINDRA BHIKAJI MORYE
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=GENERAL ADMINISTRATION DEPARTMENT, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=01344b08f37ac02e8488c61c468208e8d69a843917e75fef289 3df71ccab0faf, pseudonym=32A2EAE514431321A37494EC2A2ADF914E132F7C, serialNumber=66EC84B6738FF47B21428AD5C3E86ED22C64FDE22957 E48F885E1AB329C2660E, cn=AVINDRA BHIKAJI MORYE
Date: 2022.04.11 19:39:58 +05'30'

**( अ.भि.मोरये )**

**अवरसचिव महाराष्ट्र शासन.**

**प्रति,**

१) मा.विरोधी पक्षनेता, विधान परिषद/विधानसभा, महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालय, मुंबई
२) मा.मुख्यमंत्री यांचे प्रधान सचिव, मंत्रालय, मुंबई
३) मा.राज्यमंत्री (सा.प्र.वि.) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई
४) सचिव, माहिती व जनसंपर्क महासंचालनालय, मंत्रालय, मुंबई
५) महासंचालक, माहिती व जनसंपर्क महासंचालनालय, मुंबई
६) महालेखापाल, १ (लेखा व अनुज्ञेयता), मुंबई

७) महालेखापाल, २ (लेखापरीक्षा), नागपूर
८) उपसंचालक (लेखा), माहिती व जनसंपर्क महासंचालनालय, मंत्रालय, मुंबई,
९) अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई
१०) निवासी लेखापरीक्षा अधिकारी, मुंबई
११) लेखाधिकारी (आहरण व संवितरण), माहिती व जनसंपर्क महासंचालनालय, मंत्रालय, मुंबई
१२) निवडनस्ती (का.३४), सामान्य प्रशासन विभाग.